शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करीता नवीन विधी महाविद्यालयांच्या अंतिम मान्यतेस मुदतवाढ देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
**शासन निर्णय क्रमांक : HTED-२९०१०/१९/२०२४/ ८२४९७६ -MHT-(HE-४)**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ:** १. शासन निर्णय , उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.एनजीसी -२०१७/ (२९/१७)/मशि-४, दिनांक १५.०९.२०१७.
२. शासन निर्णय , उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र. एनजीसी-२०२२/ (१४१/२२)भाग-१/मशि-४, दिनांक ०१.०९.२०२२.
३. रिट याचिका क्र. ८८९९/२०२३ जोग एज्युकेशन सोसायटी विरुद्ध महाराष्ट्र शासन प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई यांनी दिलेले आदेश दिनांक १८.०७.२०२३

**शासन निर्णय :**

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ आणि संदर्भाधीन दिनांक १५.०९.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपद्धतीनुसार, शैक्षणिक वर्ष २०२२-२३ पासून नवीन महाविद्यालय सुरु करण्यास खालील विवरणपत्रात नमूद महाविद्यालयास अंतिम मान्यता देण्यात आलेली आहे.

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नाव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| | | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| १. | १. | जीवनदिप शैक्षणिक संस्थेचे श्रीम. स्मिता रविंद्र घोडविंदे विधी महाविद्यालय, दळखण, पो. खर्डी, ता. शहापूर, जि. ठाणे | विधी ३ वर्षे (०-६०) |

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीनुसार उपरोक्त विवरणपत्रातील महाविद्यालय शैक्षणिक वर्ष २०२२-२३ अथवा २०२३-२०२४ मध्ये सुरू करणे अभिप्रेत होते. परंतु, भारतीय विधीज्ञ परिषदेची मान्यता विलंबाने प्राप्त झाल्यामुळे महाविद्यालय विहित कालमर्यादेत सुरू झाले नाही.

रिट याचिका क्र. ८८९९/२०२३ जोग एज्युकेशन सोसायटी विरुद्ध महाराष्ट्र शासन प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई यांनी दिनांक १८.०७.२०२३ रोजी दिलेले आदेश तसेच सदर प्रकरणांमध्ये भारतीय विधीज्ञ परिषदेची मान्यता देण्यास झालेला विलंब विचारात घेऊन जीवनदिप शैक्षणिक संस्थेचे श्रीम. स्मिता रविंद्र घोडविंदे विधी महाविद्यालय, दळखण, पो. खर्डी, ता. शहापूर, जि. ठाणे या महाविद्यालयास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये **कायम विनाअनुदान तत्वावर** दिलेल्या **अंतिम मान्यतेस शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करीता** मुदतवाढ देण्यात येत आहे.

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीमधील अट क्र.९ वगळता उर्वरित सर्व अटी व शर्ती संबंधित अंतिम मान्यतेच्या अनुषंगाने लागू राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०८२११६४५३९४३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.08.21 17:00:41 +05'30'

**( अशोक मांडे )**
**उप सचिव, महराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री ,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
९) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई.
११) निवडनस्ती (मशि-४).